**जनश्री विमा योजनेचे नामकरण आम आदमी विमा योजना असे करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
शासन निर्णय क्र.जनश्री २०१६/प्र.क्र.९९/काम-७अ
मंत्रालय - मुंबई-४०० ०३२
दिनांक- २८ नोव्हेंबर,२०१६.

वाचा:-१.शासन निर्णय उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,प्राधिकरण-३२००४/प्र.क्र.३४२/काम- ७, दि.१२.०८.२००४

२.शासन निर्णय उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,प्राधिकरण-३२००४/प्र.क्र.३४२/काम ७, दि.२४.१०.२००५

३.सहसचिव ,वित्त मंत्रालय विभाग,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र दि.१४/१२/२०१२

४.पश्चिम क्षेत्रीय कार्याल,भारतीय आयुर्विमा महामंडळ यांचे पत्र.दि. २१/११/२०१३

प्रस्तावना:-

महाराष्ट्र विडी कामगार,ऊसतोड कामगार,बांधकाम मजूर,दगड खाणीतील कामगार,विणकर यंत्रमाग कामगार,शेतमजूर,कचरा गोळा करणारे कामगार,घर कामगार, रिक्षा ओढणारे कामगार,वर्तमानपत्र वाटप करणारे कामगार, मच्छीमार इत्यादी असंघटीत कामगारांचा एक मोठा गट कार्यरत असून त्यांना असंघटीत कामगारांना मिळणाऱ्या लाभासारखे लाभ मिळत नाहीत.तसेच या क्षेत्रातील बऱ्याचश्या कामगारांचे वार्षिक उत्पन्न हे दारिद्रय रेषेच्या मर्यादेच्या खाली आहे. त्यामुळे सामाजिक न्यायाचे पुढचे पाऊल म्हणून भारतीय आर्युविमा महामंडळातर्फे (LIC) राबविण्यात येत असलेली जनरश्री विमा योजना महाराष्ट्रातील सर्व असंघटीत कामगारांसाठी राबविण्याचा निर्णय दि. १२.०८.२००४ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. केंद्र शासनाने असंघटीत कामगार विधेयक सन २००३ अन्वये घोषित केलेल्या १२२ व्यवसायामध्ये काम करणाऱ्या असंघटीत कामगारांसाठी ही योजना राबविण्याचा निर्णय दि. २४.१०.२००५ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

केंद्र शासनाचे दिनांक १४.१२.२०१२ रोजीचे अर्ध शासकीय पत्र व भारतीय आर्युविमा महामंडळाच्या पश्चिम क्षेत्रीय कार्यालयाकडून दि.२१/११/२०१३ रोजीच्या या कार्यालयास प्राप्त झालेल्या पत्रानूसार जनश्री विमा योजना व आम आदमी या दोनही विमा योजनांची वैशिष्टये व लाभ सारखेच असल्यामुळे दि. ०१/०१/२०१३ पासून जनश्री विमा योजना आम आदमी योजनेमध्ये विलीन करण्यात आली असून यापुढे सदर योजना आम आदमी विमा योजना म्हणून संबोधण्यात येणार असल्याचे कळविले आहे. त्यामुळे सदर नावात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्यामुळे शासन आता पुढील निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u>**: -

दि.०१/०१/२०१३ पासून जनश्री विमा योजनेस यापूढे आम आदमी विमा योजना असे संबोधण्यात यावे.जनश्री विमा योजनेची वैशिष्टये व लाभ आम आदमी विमा योजनेमध्येही यापुर्वीप्रमाणेच राहतील.

३. हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२८११०७०६३२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shweta Singhal

Digitally signed by Shweta Singhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7203cea00960f7861c8830030dc18f6cc72052ef4c9a2526ed85e04c8004947a, cn=Shweta Singhal
Date: 2016.11.29 12:27:00 +05'30'

**(श्वेता सिंघल)**
शासनाचे उप सचिव

**प्रत:-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सहसचिव
२) मा. मंत्री ( कामगार) यांचे खाजगी सचिव,
३) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव,
४) मा. मंत्री ( सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव,
५) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव,
६) मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव,
७) मा. मंत्री (समाज कल्याण) यांचे खाजगी सचिव,
८) मा. मंत्री ( शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
९) मा. मंत्री (महिला व बालविकास) यांचे खाजगी सचिव
१०) मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,
११) प्रधान सचिव(कामगार) यांचे स्वीय सहाय्यक,
१२) प्रधान सचिव(ग्रामविकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक,
१३) कामगार आयुक्त,मुंबई
१४) विकास आयुक्त (असंघटीत कामगार), मुंबई.
१५) सर्व विभागीय आयुक्त,मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१६) सर्व जिल्हाधिकारी,
१७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१८) सह कामगार आयुक्त,मुंबई
१९) अपर कामगार आयुक्त,मुंबई/पुणे/नागपूर

२०) सर्व उप कामगार आयुक्त
२१) उप सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक,
२२) मंत्रालयीन सर्व विभाग,
२३) अधिदाने व लेखा कार्यालय,मुंबई.
२४) सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा,महाराष्ट्र राज्य,
२५) भारतीय आयुर्विमा महामंडळ,मुंबई.
२६) कामगार विभागातील सर्व अधिकारी,मंत्रालय,मुंबई ३२.
२७) निवड नस्ती (काम ७-अ)